**राज्यातील नगर परिषद कर्मचारी / राज्यस्तरीय संवर्गातील रिक्त पदे सरळसेवेने भरण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एमसीओ-२०१७/प्र.क्र.६९/नवि-१४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०७.०३.२०१७

**संदर्भ :-** १. नगर विकास विभाग, अधिसूचना क्र. एमसीओ-१२०३/१२४६/सीआर-१७५/०३/नवि-१४, दि. ११.०१.२००७
२. नगर विकास विभाग, अधिसूचना क्र. एमसीओ -१००८/३६५/सीआर-७६/८/नवि-१४, दि. २८.०१.२०१०

**प्रस्तावना :-**

राज्यातील नगर परिषदेमधील दैनंदिन काम व विकास कामांचे सुसूत्रीकरण व्हावे, त्यांच्या सेवा शर्ती, वेतनश्रेणी यांच्यात समानता असावी व विहित शैक्षणिक अर्हता पात्र जबाबदार अधिकारी नगर परिषद प्रशासनास उपलब्ध व्हावेत म्हणून शासनाने उपरोक्त संदर्भ क्र १ मधील दि. ११.०१.२००७ च्या शासन निर्णयान्वये एकूण ६ महाराष्ट्र नगर परिषद कर्मचारी राज्यस्तरीय संवर्ग स्थापन केलेले आहेत.

जागतिकीकरणाच्या पार्श्वभूमीवर नागरीकरणाच्या प्रमाणामध्ये मोठया प्रमाणावर वाढ झालेली आहे. नागरीकरणाच्या अनुषंगाने सर्वसाधारण जनतेच्या नागरी प्रशासनाकडून मोठया प्रमाणावर अपेक्षा आहेत त्या पार्श्वभूमीवर नागरी स्थानिक संस्थंमध्ये पदे रिक्त ठेवणे उचित नाही. उपरोक्त संदर्भ क्र. १ अन्वये राज्यस्तरीय संवर्गातील ६ सेवा या जनतेच्या दैनंदिन बाबींशी संबंधित आहेत.

सुधारित सेवा शर्ती नियम, २००६ ची अधिसूचना व संदर्भीय क्र. २ येथील दि. २८.०१.२०१० च्या अधिसूचने अन्वये राज्यस्तरीय संवर्गातील श्रेणींचे नियुक्ती प्राधिकारी विहित केलेले आहेत. सदर राज्यस्तरीय संवर्गातील पदांची विभागणी जिल्हा/ विभागीय/ राज्यस्तरीय अशी करण्यात आली आहे. त्यामुळे संबंधित पदांचे नियुक्ती प्राधिकारी हे जिल्हा तथा विभागीय पातळीवरील असल्याने व त्या पदावर भरती जिल्हा/विभागीय पातळीवर केल्यामुळे पुरेशा प्रमाणात स्पर्धा न झाल्यामुळे त्या दर्जाचे अधिकारी/ कर्मचारी उपलब्ध होण्याची शक्यता कमी असल्याचे दिसून येते. त्यामुळे राज्यस्तरीय म्हणून त्यामध्ये एकजिनसीपणा रहात नाही. त्यामुळे राज्यस्तरीय संवर्गातील पदांची जिल्हा/ विभागीय/ राज्यस्तरीय अशी विभागणी न करता ही सर्व पदे राज्यस्तरीय करण्याची, तसेच सदर पदे भरताना एकसुत्रीपणा आणण्याकरीता कार्यपध्दती अवलंबिण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यस्तरीय संवर्गातील पदे भरतांना एकसुत्रीपणा यावा तसेच सदर संवर्गातील रिक्त असलेली पदे भरण्याकरीता शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

१. शासन निर्णय, वित्त विभाग दि. ०२.०६.२०१५ मधील पद भरतीवरील निर्बंध शिथिल करून महाराष्ट्र नगर परिषद राज्यस्तरीय संवर्गातील ५ संवर्गांची (अग्नीशमन सेवा संवर्ग वगळता) १४८३ पदे विहित प्रक्रिया अवलंबून सरळसेवेने भरण्यात यावीत.
२. दि. ११.०१.२००७ व दि. २८.०१.२०१० मधील अधिसूचनांनुसार राज्य संवर्गातील पदांची जिल्हा/ विभागीय/ राज्यस्तरीय अशी वर्गवारी न ठेवता राज्यस्तरीय पदे अशी वर्गवारी करण्यात येत आहे.

३. या राज्यस्तरीय संवर्गातील पदांकरीता आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना नियुक्ती प्राधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहेत.

४. उपरोक्त राज्यस्तरीय संवर्गातील सरळसेवेने भरावयाची पदे दि. ११.०१.२००७ व दि. २८.०१.२०१० अन्वये पदोन्नती/ समावेशनाने भरती करण्याकरीता गठीत करण्यात आलेल्या आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांच्या अध्यक्षतेखालील समितीमार्फत भरण्यास शासन मान्यता देत आहे.

५. महाराष्ट्र नगर परिषद वित्त व लेखा सेवा संवर्गातील पदांकरीता सध्या असलेली C.A., वाणिज्य शाखेतील पदवी व M.I.C.W. या शैक्षणिक अर्हते ऐवजी "वाणिज्य शाखेतील पदवी" अशी अर्हता विहित करण्यात येत आहे. त्याअनुषंगाने संबंधित नियमांमध्ये आवश्यक ती सुधारणा करण्याबाबत स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येत आहे.

६. स्वच्छता निरिक्षक या पदाचा समावेश राज्यस्तरीय संवर्गामध्ये करण्याकरीता मान्यता देण्यात येत आहे. स्वच्छता निरिक्षकांची रिक्त असलेली पदे भरण्यात यावीत. तसेच आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना या पदाचे नियुक्ती प्राधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. स्वच्छता निरीक्षक या पदांचे समावेशन राज्यस्तरीय संवर्गामध्ये करण्याकरीता संबंधित नियमांमध्ये तरतुद करण्याबाबत स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येत आहे.

७. आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय यांनी सदर पदभरती नवनिर्मित नगर परिषदा/ नगर पंचायतींमध्ये शासन निर्णय दि. ०५.०७.२०१६ अन्वये नव्याने निर्माण करण्यात आलेली पदे सदर शासन निर्णयामध्ये विहित करण्यात आलेली कार्यपध्दती अनुसरुन सत्वर भरावीत.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०७१६०९०५४९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.03.07 16:11:16 +05'30'

**( ज.ना.पाटील )**
**शासनाचे सहसचिव**

**प्रति,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
२. सर्व विभागीय आयुक्त,
३. सर्व जिल्हाधिकारी
४. सर्व मुख्याधिकारी
५. प्रधान सचिव, यांचे विशेष कार्य अधिकारी (नवि-२)
६. निवडनस्ती (नवि-१४) नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.